कोविड-१९ बाबत अभियान व विशेष जनजागृती मोहीम जनजागृती मोहीम राबविण्यासाठी खर्चास मान्यता मिळण्याबाबत.......

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**निर्णय क्रमांक : मावज-२०२०/प्र.क्र.१२७/का-३४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १९ नोव्हेंबर, २०२०

वाचा:- १. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र.वृत्तचित्र-२०२०-२१/वि.प्र.मो./ का-७/२८८ दि.१५ ऑक्टोबर, २०२०

**प्रस्तावना :-**

कोविड-१९ या विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासकीय संदेश जनतेपर्यंत व्यापकरित्या पोहचविण्यासाठी मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षेखालील बैठकांमध्ये प्रामुख्याने कोविड-१९ या विषाणूचा संसर्ग रोखण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या उपाययोजनांची माहिती सर्वसामान्य जनतेला होऊन जनजागृती करण्यासाठी विविध मोहीमा, अभियान, उपक्रम राबविण्याचे प्रस्तावित आहेत. त्या अनुषंगाने विशेष प्रसिध्दी मोहीमेअंतर्गत माझे कुटुंब माझी जबाबदारी, कोविड-१९ बाबत अभियान व विशेष जनजागृती मोहीम राबविण्यासाठी येणाऱ्या खर्चास शासनाची मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. विशेष प्रसिद्धी मोहिमेअंतर्गत कोविड-१९ बाबत अभियान व विशेष जनजागृती मोहीम राबविण्यासाठी शासकीय योजनांची विशेष प्रसिद्धी मोहिम (कार्यक्रम) (२२२०११७५), २६-जाहिरात व प्रसिद्धी या लेखाशिर्षातर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता रु.१७०.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. कोविड-१९ या संसर्गजन्य विषाणुमूळे या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्त विभागाच्या दिनांक ४ मे, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार वित्तीय उपाययोजना राबविण्यात आल्या आहेत.

२. या उपाययोजनांमध्ये विविध कार्यक्रमांतर्गत करण्यात यावयाचा खर्च ३३% मर्यादेत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि, कोविड-१९ या विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी सर्वसामान्य जनतेमध्ये जनजागृती अधिक प्रभावीपणे व सातत्याने करणे आवश्यक असल्याने एक विशेष बाब म्हणून वित्त विभागाने दि.४ मे, २०२० अन्वये विविध उपाययोजनांमध्ये घातलेली ३३% खर्चाची मर्यादा शिथिल करुन ५०% करण्यास व त्यानुसार रु.८५ कोटीच्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. याशिवाय कोविड-१९ अभियान व प्रसिद्धी मोहीमेसाठी रु.३५ कोटी खर्चास पूर्ण प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून वित्त विभागाच्या शासन निर्णय दि.४ मे, २०२० अन्वये विविध उपाययोजनांमध्ये घातलेल्या निर्बंधांमधून सूट देण्यात येत आहे.

४. वरील प्रयोजनासाठी येणारा खर्च “सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६, २२२०-माहिती व प्रसिध्दी ६० इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिध्दी, (००)(०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहिम, २६-जाहिरात व प्रसिध्दी (संगणक सांकेतांक २२२० ११७५) (योजनांतर्गत)” या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर खर्च करताना शासनाचे प्रचलित नियम/आदेश, कार्यपध्दती इ. चा अवलंब करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७४/१४४३, दि.२०/१०/२०२० अन्वये व वित्त विभागाच्या प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११९१४४६४७८१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Digitally signed by Vijay Marotrao Nandekar
Date: 2020.11.19 14:51:19 +05'30'

**( वि.मा.नांदेकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
६. सर्व संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
७. मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई, नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, नागपूर
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११.नियोजन विभाग/का.१४४३ व वित्त विभाग/व्यय-४
१२.सर्व मंत्रालयीन विभाग
१३.उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती कार्या-३४